**अंबरनाथ नगरपरिषदेस जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाअंतर्गत मंजूर भुयारी गटार योजनेकरीता एमएमआरडीए मार्फत कर्ज घेण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एनयुआर-२०१४/प्र.क्र.१२६/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १३ मार्च, २०१५

वाचा -

**मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपरिषद यांचे पत्र क्रमांक अंनप/लेखा/२०१३-१४/३४४ दिनांक ३/१२/२०१३ रोजीचे पत्र**

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय पुर्ननिर्माण अभियानाअंतर्गत देशातील निवडक शहरांचा समावेश करण्यात आला होता. अंबरनाथ नगरपरिषद ही जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुर्ननिर्माण अभियानात समाविष्ट असून, सदर अभियानाच्या नगर विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या नागरी पायाभूत सुविधा व प्रशासन (युआयजी) उप अभियानाअंतर्गत अंबरनाथ शहराच्या भुयारी गटार योजनेस केंद्र शासनाने मानयता दिलेली होती. सदर प्रकल्पाचा तपशील खालीलप्रमाणे आहे

(रूपये कोटीत)

| अनु क्र. | नगरपरिषदेचे नाव | प्रकल्पाचे नाव | मंजूर किंमत | केंद्र शासनाचा हिस्सा | राज्य शासनाचा हिस्सा | नगरपरिषदेचा हिस्सा | केंद्र शासनाने मंजूरी दिल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | अंबरनाथ | भुयारी गटार | १०९.४१५७ | ३८.२९५५ | १६.४१२३ | ५४.७०७९ | ०७.०२.२०१२ |

अंबरनाथ नगरपरिषदेचा भुयारी गटार प्रकल्प पूर्ण करण्यासाठी रूपये ५६.३२ कोटी कर्ज मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून घेण्यासाठी मान्यता देण्याबाबत मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपरिषद यांनी दिनांक ३/१२/२०१३ च्या पत्रान्वये विनंती केली होती. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या कार्यकारी समितीच्या २४१ व्या बैठकीमध्ये अंबरनाथ नगरपरिषदेचा भुयारी गटार योजनेच्या प्रकल्पाचे काम पूर्ण करण्यासाठी मुंबई नागरी विकास प्रकल्प फिरता निधीतून अंबरनाथ नगरपरिषदेस ५६.३२ कोटी इतके कर्ज द.सा.द.शे. ७ % व्याजदराने देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

अंबरनाथ नगरपरिषदेने सदर प्रस्तावासोबत कर्ज घेण्याच्या अनुषंगाने पारित केलेल्या ठराव क्रमांक ०१ व ४८ दिनांक १०/०४/२०१३, २९/१०/२०१३ ची प्रत सोबत जोडून पाठविली व त्यानुसार एकूण रूपये ५६.३२ कोटी इतके कर्ज मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून घेण्यास मंजूरी मिळण्याची विनंती केली आहे. उक्त विनंतीच्या सदर कर्ज उभारणीस स्थानिक प्राधिकरण कर्ज नियम १९१४ नुसार व महाराष्ट्र नगरपरिषद, नगरपंचायती व औदयोगिक नागरी अधिनियम १९६५ च्या कलम १०८ नुसार परवानगी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुर्ननिर्माण अभियानाअंतर्गत, अंबरनाथ नगरपरिषदेच्या मंजूर भुयारी गटार प्रकल्पाकरीता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून रूपये ५६.३२ कोटी इतक्या कर्ज उभारणीच्या प्रस्तावास स्थानिक प्राधिकरण कर्ज नियम १९१४ मधील व महाराष्ट्र नगरपरिषद, नगरपंचायती व औदयोगिक नागरी अधिनियम १९६५ च्या कलम १०८ मधील अटींच्या अधीन राहून तसेच खालीलप्रमाणे नमूद अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर कर्ज घेण्यास शासनाची कोणतीही हमी देण्यात येणार नाही.
२. शासनाच्या मालकीची किंवा शासनाची परवानगी आवश्यक आहे अशी कोणतीही मालमत्ता तारण/गहाण ठेवता येणार नाही.
३. कर्ज देणारी संस्था म्हणून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने सुचविलेल्या अटी व शर्ती परस्पर दोघांच्या मान्यतेने पूर्ण करण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१६१३२७१५९७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema Pradeep Dhamdhere

Digitally signed by Seema Pradeep Dhamdhere
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Seema Pradeep Dhamdhere
Date: 2015.03.16 13:38:43 +05'30'

**(सीमा ढमढेरे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (नगर विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. सचिव (नगर विकास विभाग-०२), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्र-कुर्ला संकुल, मुंबई
५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
६. जिल्हाधिकारी, ठाणे
७. विशेष कार्यअधिकारी, जेएनएनयुआरएम कक्ष, एमएमआरडीए, बांद्र-कुर्ला संकुल, मुंबई
८. मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपरिषद, जि. ठाणे
९. निवडनस्ती (नवि-३३)